**राज्यातील सर्व अकृषी विद्यापीठे, संलग्नित महाविद्यालये, अभिमत विद्यापीठे, स्वयंअर्थसहाय्यित विद्यापीठे यामधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी यापुढे १०० टक्के उपस्थित राहण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०२०/प्र.क्र.१७८/विशि-३,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १८ सप्टेंबर, २०२०.

**संदर्भः**-(१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः-समय-२०२०/प्र.क्र.३५/१८ (र. व का.), दिनांक ४ मे, २०२०

(२) शासन आदेश, आपत्ती व्यवस्थापन व मदत व पुनर्वसन, क्रमांकः- डीएमयू २०२०/ सीआर ९२/ डीआयएसएम-१, दिनांक ३१ मे, २०२०

(३)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः-समय-२०२०/प्र.क्र.३५/१८ (र. व का.), दिनांक ५ जून, २०२०

(४) शासन आदेश, आपत्ती व्यवस्थापन व मदत व पुनर्वसन, क्रमांकः- डीएमयू २०२०/ सीआर ९२/ डीआयएसएम-१, दिनांक ३१ ऑगस्ट, २०२०

**प्रस्तावनाः-**

कोव्हिड-१९ या जागतिक महामारीच्या परिस्थितीत संपूर्ण देशात टाळेबंदी घोषित करण्यात आलेली आहे. सदर टाळेबंदीमुळे प्रशासकीय कार्यालयीन कामकाज हे मर्यादीत कर्मचाऱ्यांच्या उपस्थितीत पार पाडण्यात येत आहे.

विद्यापीठ अनुदान आयोगाच्या अंतिम वर्षाच्या विद्यार्थ्यांच्या परीक्षा घेण्यासंदर्भात दिनांक ६.०७.२०२० रोजीच्या मार्गदर्शक सूचनांना आव्हान देणाऱ्या तसेच राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण आणि राज्य सरकार यांच्या अंतिम वर्षाच्या परीक्षा न घेण्याच्या निर्णयास आव्हान देणाऱ्या विविध रिट याचिका मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आल्या होत्या. सदर याचिकांमध्ये मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.२८ ऑगस्ट, २०२० रोजी निर्णय दिला असून त्यानुसार राज्यात विद्यापीठाच्या अंतिम वर्षाच्या/ अंतिम सत्राच्या परीक्षा घ्यावयाच्या आहेत.

सदर परीक्षेच्या कामकाजाकरिता शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची आवश्यकता आहे. प्रचलित कार्यपध्दतीनुसार परीक्षा पध्दतीमध्ये अनेक प्रक्रियांचा समावेश असून त्यामध्ये प्रश्नपत्रिका तयार करणे, उत्तरपत्रिका तपासणे, गुणपत्रिका तयार करणे, निकाल घोषित करणे, फेरमूल्यांकन करणे, अशी अनेक कामे समाविष्ट आहेत. सदर परीक्षा दि.१ ऑक्टोबर, २०२० ते दि.३१ ऑक्टोबर,

२०२० या कालावधीत घेऊन त्याचा निकाल नोव्हेंबर, २०२० च्या पहिल्या आठवड्यात जाहिर करणे याकरिता मोठ्या प्रमाणावर मनुष्यबळाची आवश्यकता आहे. एकंदरीत कमी कालावधीत परीक्षा पार पाडणे व त्याचा निकाल जाहिर करणे हे आव्हानात्मक काम प्राप्त परिस्थितीत पूर्ण करण्यासाठी विद्यापीठे/शैक्षणिक संस्थेच्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची यापुढे १०० % उपस्थिती असणे आवश्यक आहे.

**शासन निर्णयः-** उपरोक्त बाब विचारात घेता, या शासन निर्णयान्वये शासन राज्यात विद्यापीठाच्या अंतिम वर्षाच्या/ अंतिम सत्राच्या परीक्षा घेण्यात येत असल्याने विद्यापीठे/शैक्षणिक संस्थेच्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची यापुढे १०० % उपस्थिती राहिल, असा निर्णय घेत आहे.

२. कोरोना विषाणूंचा प्रसार होऊ नये तसेच कार्यालयातील अधिकारी/ कर्मचारी यांना त्याचा संसर्ग होऊ नये म्हणून राज्य शासनाच्या तसेच सार्वजनिक आरोग्य विभागाने वेळोवेळी प्रसिध्द केलेल्या आदेशातील सर्व मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे. यासंदर्भात सर्व संबंधित विद्यापीठांनी/शैक्षणिक संस्थांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९१८१६४८१९५६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Pravinkumar Gulabrao Pawar

Digitally signed by Pravinkumar Gulabrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8de261729f06eda4a56aba947eceb6140d7406426b2f08c9317bea2458ec1f92, serialNumber=8f18625adb482a7ee2512cea93ce697388c95a99c89e41e85c05a3de8476488f, cn=Pravinkumar Gulabrao Pawar
Date: 2020.09.18 16:49:16 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७) मा.अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) मा.सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई
९) मा.कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे
१०) मा.कुलगुरु, सर्व अभिमत विद्यापीठे

११) मा.कुलगुरु, सर्व स्वयंअर्थसहाय्यित विद्यापीठे
१२) मा.कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, रायगड
१३) मा.कुलगुरु, कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक, नागपूर
१४) मा.कुलगुरु, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
१५) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, पुणे
१६) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, मुंबई
१७) संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र, मुंबई
१८) निवडनस्ती (विशि-३).